**बद्रियाह हायस्कूल, रविवार पेठ, पुणे या शाळेचे शासन अनुदान बंद करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- माशाअ-२०१८/प्र.क्र.२०८/एसएम-४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- २० जानेवारी, २०२२.

वाचा :-
१) शिक्षणाधिकारी (प्राथमिक), जिल्हा परिषद, पुणे यांचे क्र. जि.प. शिक्षण/प्राथ/खाप्राशा/ ३४९/ २०१४, दिनांक ६/३/२०१४.
२) बद्रियाह एज्युकेशन ट्रस्ट, रविवार पेठ, पुणे यांचे दिनांक २७/११/२०१७ चे निवेदन
३) बद्रियाह एज्युकेशन ट्रस्ट, रविवार पेठ, पुणे यांचा दिनांक २३/३/२०१८ रोजीचा ठराव क्रमांक ३.
४) शिक्षणाधिकारी (माध्य.), जिल्हा परिषद, पुणे यांचा दिनांक २८/३/२०१८ रोजीचा चौकशी अहवाल.
५) मा. खजिनदार, बद्रियाह एज्युकेशन ट्रस्ट, पुणे यांचे दिनांक २४/१०/२०१८ चे हमीपत्र.
६) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), पुणे यांचे पत्र क्र. अमाशा/स्वयं अर्थ/२०१८/ १७-१८/३०१/९३, १०३, दि. १४/१२/२०१८.

**प्रस्तावना:-**

बालकांच्या मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा हक्क नियम-२०११ अंतर्गत बद्रियाह एज्युकेशन ट्रस्ट्र या अल्पसंख्यांक दर्जा प्रमाणपत्र नोंदणीकृत संस्थेच्या बद्रियाह हायस्कूल, रविवार पेठ, पुणे या शाळेच्या इयत्ता ५ वी ते ८ वी च्या वर्गाकरता शिक्षणाधिकारी (प्राथमिक), जि.प., पुणे यांनी संदर्भ-१ अन्वये, दिनांक १ एप्रिल, २०१३ ते ३१ मार्च, २०१६ पर्यंत तीन वर्षाच्या कालावधीसाठी स्वमान्यता प्रमाणपत्र देण्यात आले होते. तसेच पुढील ३ वर्षाकरीता स्वमान्यता प्रमाणपत्र मिळण्याकरीता सदर शाळेने शिक्षणाधिकारी(प्राथमिक) यांचेकडे दिनांक ६/८/२०१८ अन्वये प्रस्ताव सादर केला होता. त्यानुसार, सन १९७२ पासून शाळेतील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी यांना १०० टक्के वेतन अनुदान मिळत असल्याचे नमूद केले आहे.

बद्रियाह एज्युकेशन ट्रस्ट, पुणे यांनी संदर्भ क्र. १ व २ येथील पत्रान्वये, बद्रियाह हायस्कूल, पुणे या शाळेचे अनुदान बंद करण्याची विनंती केली आहे. तसेच, संदर्भ क्र (३) येथील पत्रान्वये, सदर संस्थेने दिनांक २३/३/२०१८ रोजी ठराव क्रमांक ३ नुसार, यापुढे सदर संस्थेच्या बद्रियाह हायस्कूल, रविवार पेठ, पुणे ही शाळा दिनांक १/६/२०१८ पासून विनाअनुदान तत्वावर चालू ठेवण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. त्यानुसार, सदर शाळा दिनांक १/६/२०१८ पासून विना अनुदान तत्वावर सुरु आहे.

संबंधीत शाळेच्या व्यवस्थापनाने हमीपत्र सादर केले असून, त्यानुसार, सदर शाळेत प्रवेश घेतलेल्या विद्यार्थ्यांना, शाळा विनाअनुदानित घोषित केल्यानंतर इतर अनुदानित किंवा विनाअनुदानित शाळेत प्रवेश घ्यावयाचा असेल तर सदर संस्था शाळा विद्यार्थ्यांना अडचण निर्माण करणार नाही. तसेच शाळेत प्रविष्ठ असणाऱ्या वर्गातील विद्यार्थ्यांचे शिक्षण पूर्ण होईपर्यंत, विद्यार्थ्यांकडून बळजबरीने फी वसूल करणार नाही असे बंधपत्र लिहून दिले आहे.

सदर प्रकरणी, शिक्षणाधिकारी (माध्यमिक), जि.प., पुणे यांनी संदर्भ क्र. (४) येथील पत्रान्वये सादर केलेल्या चौकशी अहवालानूसार, सदर संस्थेच्या मागणीनुसार दि. १ जून, २०१८ पासून शासनाचे अनुदान बंद करण्याबाबत शिफारस करण्यात आली आहे.

त्यानुसार, शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), पुणे यांनी संदर्भ-५ अन्वये, बद्रियाह हायस्कूल (रविवार पेठ), पुणे या शाळेचे शासन अनुदान बंद करणेबाबत शासनास प्रस्ताव सादर केला आहे. सदर बाब विचारात घेता, बद्रियाह हायस्कूल, रविवार पेठ, पुणे या शाळेचे शासन अनुदान बंद करण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

बद्रीयाह एज्युकेशन ट्रस्ट, पुणे यांनी संदर्भ क्र. (१) येथील पत्रान्वये केलेल्या विनंतीच्या अनुषंगाने, बद्रियाह हायस्कूल, (रविवार पेठ), पुणे या शाळेचे सन २०१८-१९ पासून वेतन अनुदान कायमस्वरुपी बंद करण्यास खालील अटीच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

१) सदर शाळा यापुढे भविष्यात कोणत्याही प्रकारचे वेतन अनुदानाची मागणी करणार नाही.
२) संस्थेमार्फत नियुक्त करण्यात आलेल्या शिक्षक व इतर कर्मचाऱ्यांचे वेतन संस्थेमार्फत करण्यात येईल.
३) सदर शाळेतील शिक्षक व इतर कर्मचाऱ्यांच्या वेतनविषयक / सेवाविषयक तक्रारी होणार नाहीत याची संस्थेने काळजी घ्यावी.
४) भविष्यात शिक्षक व इतर कर्मचाऱ्यांच्या वेतन / सेवाविषयक बाबी संदर्भात काही वाद उद्भवल्यास त्याची शासन स्तरावर दखल घेतली जाणार नाही.

२. शिक्षण उपसंचालक, पुणे विभाग यांनी सदर प्रकरणी उचित कार्यवाही करुन, केलेल्या कार्यवाहीचा अहवाल आयुक्त (शिक्षण), शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना सादर करावा व त्याची प्रत शासनास सादर करावी.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२२०१२०१५१४४१३६२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by TIKARAM WAMAN KARPATE
Date: 2022.01.20 15:15:54 +05'30'

**( टि. वा. करपते )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) आयुक्त (शिक्षण), शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
२) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे.
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१/२ महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
४) महालेखापाल (लेखापरिक्षा)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
५) विभागीय शिक्षण उपसंचालक, पुणे विभाग, पुणे
६) शिक्षणाधिकारी (माध्यमिक ), जिल्हा परिषद, पुणे
७) अधिक्षक, वेतन पथक (माध्यमिक), जिल्हा परिषद, पुणे
८) निवड नस्ती, एसएम-४.